सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील मुख्य प्रशासकीय अधिकारी संवर्गातील अधिकारी यांच्या बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२२/प्र.क्र.१५३/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : १५ मे, २०२३

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सामान्य राज्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२० : ५६१००-१७७५००) मधील मुख्य प्रशासकीय अधिकारी संवर्गातील अधिकारी यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| क्र | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | श्री. अनिल संपतराव बांगर, मुख्य प्रशासकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, बुलढाणा. | मुख्य प्रशासकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, औंध, जि.पुणे (विनंतीनुसार रिक्त पदी) |
| २. | श्री.राजदीप दिनेश कुलकर्णी, मुख्य प्रशासकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, बीड. | मुख्य प्रशासकीय अधिकारी, उप संचालक (क्षय व बीसीजी), पुणे (प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदी) |
| ३. | श्री.शैलेश रामचंद्र पाटणकर, मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. | मुख्य प्रशासकीय अधिकारी, उप संचालक, आरोग्य सेवा कार्यालय, ठाणे (विनंतीनुसार रिक्त पदी) |
| ४. | श्रीमती स्मिता कारेगावकर, मुख्य प्रशासकीय अधिकारी, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे | मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (श्री.पाटणकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) ( प्रशासकीय कारणास्तव) |
| ५. | श्री.एकनाथ मालोजी भोसले, मुख्य प्रशासकीय अधिकारी, उप संचालक, आरोग्य सेवा कार्यालय, औरंगाबाद (रिक्त पदी) | मुख्य प्रशासकीय अधिकारी, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे (श्रीमती कारेगावकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) ( प्रशासकीय कारणास्तव) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यास कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्याने त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१६४१०८१३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK
NIVARTTI
KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2023.05.15 18:45:44 +05'30'

(दीपक केंद्रे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा (१/२), मुंबई /पुणे.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व).
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व).
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे/औरंगाबाद/बीड/बुलढाणा.
९) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१०) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

११) सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१२) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१४) निवड नस्ती (सेवा - २)